राज्यातील अनुसूचित जातीच्या १०० विद्यार्थ्यांना देशातील नामांकित शैक्षणिक संस्थांमध्ये उच्च शिक्षण घेण्यासाठी राजर्षि शाहू महाराज गुणवत्ता शिष्यवृत्ती योजना सन २०२३-२४ करीता विद्यार्थ्यांची निवड

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : देशियो-२०२३/प्र.क्र.३५४/शिक्षण-१**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २६ मार्च, २०२४

वाचा:- १) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : इबीसी-२०१७/ प्र.क्र.४०२/शिक्षण-१, दिनांक ०८ नोव्हेंबर, २०१७
२) शासन शुध्दीपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : इबीसी-२०१७/प्र.क्र.४०२/ शिक्षण-१, दिनांक १९ मार्च, २०१७
३) आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्र.सकआ/शिक्षण/भासशि/देशातंर्गत/का-४ ड/बैठक/६०१३, दिनांक १९.१२.२०२३.

**प्रस्तावना :**

अनुसूचित जातीच्या (नवबौध्दसहित) विद्यार्थ्यांना आवश्यक असणारे कौशल्य व ज्ञान उपलब्ध व्हावे व त्यांची विविध क्षेत्रात होणाऱ्या स्पर्धात्मक युगासाठी जडण-घडण व्हावी याकरीता देशातील नामांकित शैक्षणिक संस्थांमध्ये उच्च शिक्षण घेण्यासाठी राजर्षि शाहू महाराज गुणवत्ता शिष्यवृत्ती योजना शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इबीसी-२००३/प्र.क्र.३२३/ मावक-२, दिनांक ११ जून,२००३ अन्वये लागू करण्यात आली आहे. सदर योजनेच्या नियमावलीसंदर्भात यापुर्वीचे सर्व शासन निर्णय अधिक्रमित करुन योजनेची सुधारीत नियमावली संदर्भीय दिनांक ०८ नोव्हेंबर, २०१७ च्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आली आहे.

२. सदर शासन निर्णयात नमुद केल्याप्रमाणे आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्या अध्यक्षतेखालील निवड समितीने, सन २०२३-२४ करीता देशातील नामांकित शैक्षणिक संस्थांमध्ये प्रवेशित विद्यार्थ्यांसाठी निवड प्रक्रिया राबवुन त्याद्वारे प्राप्त झालेल्या अर्जांतुन विहीत अटी व शर्ती नुसार दि. २५.१०.२०२३ आणि दि. ३०.११.२०२३ रोजी संपन्न झालेल्या निवड समितीच्या बैठकीत झालेल्या कार्यवाहीचे इतिवृत्तासह निवड केलेल्या २४ विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर करण्याचा प्रस्ताव त्यांच्या दिनांक १९.१२.२०२३ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेला होता. सदरील प्रस्तावाच्या अनुषंगाने एकुण २४ विद्यार्थ्यांना राजर्षि शाहू महाराज गुणवत्ता शिष्यवृत्ती योजनेचा लाभ देण्याचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना देशातील नामांकित शैक्षणिक संस्थांमध्ये उच्च शिक्षण घेण्यासाठी राजर्षि शाहू महाराज गुणवत्ता शिष्यवृत्तीसाठी शासन निर्णय, दिनांक ०८ नोव्हेंबर, २०१७ अन्वये गठीत करण्यात आलेल्या निवड समितीच्या दि. २५.१०.२०२३ आणि दि. ३०.११.२०२३ रोजीच्या बैठकीत निवड करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांपैकी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या **प्रपत्र-अ-१, अ-२ व अ-३ आणि प्रपत्र-ब-१ ते ब-२** मधील **एकूण २४ पात्र विद्यार्थ्यांना सन २०२३-२४ करीता राजर्षि शाहू महाराज गुणवत्ता शिष्यवृत्ती मंजूर करण्यात येत आहे.**

२. ज्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजुर करण्यात आली आहे, त्या विद्यार्थ्यांना त्या- त्या शैक्षणिक संस्थेने ठरवून दिलेले पुर्ण शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्क समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांच्यामार्फत संस्थेला देण्यात येईल. विद्यार्थ्यांना शैक्षणिक संस्थेने वसतीगृह व भोजन शुल्क त्यांच्या आकारणीप्रमाणे पुर्ण खर्च देण्यात येईल. सदर

खर्चाची रक्कम वर्षभरात एकदाच देण्यात येईल. अभ्यासक्रमासाठी लागणारी पुस्तके, शैक्षणिक साहित्य त्याचप्रमाणे इतर शैक्षणिक खर्च यासाठी एकुण रुपये १०,०००/- प्रत्येक वर्षी देण्यात येतील. त्यांच्या अभ्यासक्रमाच्या खर्चासाठी सन २०२३-२४ या वर्षाच्या शिक्षण शुल्क, परिक्षा शुल्क व वसतीगृह भाडे, निर्वाह भत्ता व इतर अनुज्ञेय खर्च याबाबत संबधित विद्यापीठाकडून/संस्थेकडून माहिती मागवून आणि विद्यार्थ्याच्या प्रगती व उपस्थितीबाबतचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घेऊन संबधित महाविद्यालय/संस्थेस अदा करावी.

३. सोबतच्या **प्रपत्र-अ-१ ते अ-३, प्रपत्र -ब-१ ते प्रपत्र ब २** मध्ये नमुद केलेल्या ज्या विद्यार्थ्यांना राजर्षी शाहू महाराज गुणवत्ता शिष्यवृत्ती मंजुर करण्यात आली आहे, त्या विद्यार्थ्यांपैकी ज्या विद्यार्थ्यांना भारत सरकार मॅट्रीकोत्तर परिक्षोत्तर शिष्यवृत्ती मिळाली असेल, ती रक्कम कमी करुन उरलेली अनुज्ञेय रक्कम विद्यार्थ्यांस अदा करण्यात यावी.

४. सदरहू विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती प्रदान करण्यासाठी आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. याबाबत होणारा खर्च हा "मागणी क्रमांक एन-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०१ - अनुसूचित जातीचे कल्याण, २७७ - शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना विघयो (०४) (२२) उच्च शिक्षणासाठी अनुसुचित जातीच्या विद्यार्थ्यांना राजर्षि शाहू महाराज शिष्यवृत्ती (२२२५ ३८२३), ३४-शिष्यवृत्त्या/विद्यावेतने" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून त्याखाली केलेल्या चालू आर्थिक वर्षाच्या तरतूदीमधून भागविण्यात यावा. त्याकरीता आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२६१६४८१९२५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929,
cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.03.26 17:01:05 +05'30'

**( प्रशान्त वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई
३. प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,मुंबई
४. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग मंत्रालय,मुंबई
५. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, ३ महापालिका मार्ग, मुंबई
८. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. संचालक, माहिती व तंत्रज्ञान, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परीक्षा)/(लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१३. अवर सचिव (अर्थसंकल्प) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई
१४. कक्ष अधिकारी (विघयो-१) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग ,मंत्रालय,मुंबई
१५. निवड नस्ती, शिक्षण १

**(शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र : देशियो-२०२३/प्र.क्र.३५४/शिक्षण-१, दिनांक : २६ मार्च, २०२४ चे सहपत्र)**

---

**प्रपत्र अ-१**

**राजर्षि शाहू महाराज देशांतर्गत शिष्यवृत्ती योजनेंतर्गत प्रथम वर्ष पदवी अभ्यासक्रमासाठी सन २०२३-२४ करीता विद्यार्थ्यांची निवड**

| अ. क्र. | परिक्षा मंडळाचे नांव (HSC) | विद्यार्थ्याचे संपूर्ण नाव | प्रवेश घेतलेल्या संस्थेचे नाव | अभ्यासक्रमाचे नाव | कालावधी (वर्ष) | HSC मधील गुणांची टक्केवारी (%) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | नागपूर | भुषण अरूणराव फुले | Collage of Engineering Pune | B.E. Mechanical Engineering | ४ | ८१.५० |
| २ | अमरावती | आदित्य विठ्ठल खडसे | Collage of Engineering Pune | B.E | ४ | ७८.८३ |
| ३ | अमरावती | रणवीर रविंद्र अरखराव | VJTI, Matunga, Mumbai | B.E | ४ | ८०.५० |
| ४ | नागपूर | पृथा रुपराव इंगळे | VJTI, Matunga, Mumbai | B.E | ४ | ८१.८३ |
| ५ | नागपूर | आयुष अरविंद नारायणे | Sardar Vallabhbhai National Institute of Technology Ichchhanath, Surat, Gujrat | B.Tech. | ४ | ७५.१७ |
| ६ | अमरावती | सई हितेन रामटेके | VJTI, Matunga, Mumbai | B.E | ४ | ८७.८३ |
| ७ | छत्रपती संभाजीनगर | सत्यजीत प्रमोद निकाळजे | National Institute of design, Ahmedabad | Bachelor of Design | ४ | ७३.१७ |

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.03.26 17:01:27 +05'30'

( प्रशान्त वाघ )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

## प्रपत्र क्र- अ-२

## राजर्षि शाहू महाराज देशांतर्गत शिष्यवृत्ती योजनेंतर्गत द्वितीय वर्ष पदवी अभ्यासक्रमासाठी सन २०२३-२४ करीता विद्यार्थ्यांची निवड

| अ. क्र. | परिक्षा मंडळाचे नांव (HSC) | विद्यार्थ्याचे संपूर्ण नाव | प्रवेश घेतलेल्या संस्थेचे नाव | अभ्यास क्रमाचे नाव | काला वधी (वर्ष) | HSC मधील गुणांची टक्केवारी (%) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| ८ | मुंबई | पियुष प्रशांत कल्याणकर | VJTI, Matunga, Mumbai | Computer Engineering | ४ | ८८.१७ |
| ९ | छत्रपती संभाजीनगर | आदित्य नितीन पगारे | VJTI, Matunga, Mumbai | B.Tech. | ४ | ६६.०० |
| १० | मुंबई | प्रज्वल युवराज खडसे | IIT, Pune | B.Tech. | ४ | ९३.०० |
| ११ | मुंबई | सम्यक शशिकांत केदारे | IIT, Pune | B.Tech. | ४ | ९५.०० |
| १२ | छत्रपती संभाजीनगर | आदित्य रविंद्र सुर्यवंशी | IIT, Pune | B.Tech. | ४ | ८५.३३ |

## प्रपत्र क्र- अ-३

## राजर्षि शाहू महाराज देशांतर्गत शिष्यवृत्ती योजनेंतर्गत चतुर्थ वर्ष पदवी अभ्यासक्रमासाठी सन २०२३-२४ करीता विद्यार्थ्यांची निवड

| अ. क्र. | परिक्षा मंडळाचे नांव (HSC) | विद्यार्थ्याचे संपूर्ण नाव | प्रवेश घेतलेल्या संस्थेचे नाव | अभ्यास क्रमाचे नाव | काला वधी (वर्ष) | HSC मधील गुणांची टक्केवारी (%) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १३ | अमरावती | मिनल अजय मून | IIT, Kharagpur | B. Tech. | ४ | ७४.०० |

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.03.26 17:01:42 +05'30'

( प्रशान्त वाघ )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

(शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र : देशियो-२०२३/प्र.क्र.३५४/शिक्षण-१,
दिनांक : २६ मार्च,२०२४ चे सहपत्र)

---

**प्रपत्र क्र.-ब-१**

**राजर्षि शाहू महाराज देशांतर्गत शिष्यवृत्ती योजनेंतर्गत प्रथम वर्ष पदव्युत्तर पदवी प्रथम वर्ष अभ्यासक्रमासाठी सन २०२३-२४ करीता विद्यार्थ्यांची निवड**

| अ.क्र. | परिक्षा मंडळाचे नांव (HSC) | विद्यार्थ्याचे संपूर्ण नाव | प्रवेश घेतलेल्या संस्थेचे नाव | अभ्यास क्रमाचे नाव | काला वधी (वर्ष) | पदवी मधील गुणांची टक्केवारी CGPA / GPA |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १४ | नागपूर | अवंतिका अविनाश हाडके | IIM, Bangalore, Karnataka | Post Graduate Programme in Management, PGP | २ | ७.५४ |
| १५ | मुंबई | सपना विजय शिवदास | IIM, Nagpur | MBA | २ | ७१.४०% |
| १६ | अमरावती | चेतन अनिरूध्द पटवर्धन | VJTI, Matunga, Mumbai | M. Tech. | २ | ८.४९ |
| १७ | पुणे | शुभम सुनिल माने | National Institute of Pharmaceutical Educational and Research, Moholi, Punjab | MBA (Pharm) Pharmaceutical Management | २ | ७.५७ |
| १८ | नागपूर | धिरज महादेव उपाध्ये | VJTI, Matunga, Mumbai | MCA | २ | ८७.४७% |
| १९ | नागपूर | प्रगती देविदास सुरळकर | NIT, warangal | M.Sc. | २ | ८.६३ |
| २० | लातूर | राजू मुकुंद सुर्यवंशी | IIT, Gandhinagar | M. Tech. | २ | ८.४६ |
| २१ | नागपूर | भुषण संजयराव कुंभारे | IIT, Kharagpur | M. Tech. | २ | ६.२८ |
| २२ | मुंबई | हर्षल माणिक भित्रे | IIM, Shilong | Post Graduate Programme in Management in PGP | २ | ५.९५ |

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.03.26 17:01:59 +05'30'

(प्रशान्त वाघ)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रपत्र क्र.-ब-२**

**राजर्षि शाहू महाराज देशांतर्गत शिष्यवृत्ती योजनेंतर्गत प्रथम वर्ष पदव्युत्तर पदवी द्वितीय वर्ष अभ्यासक्रमासाठी सन २०२३-२४ करीता विद्यार्थ्यांची निवड**

| अ. क्र. | परिक्षा मंडळाचे नांव (HSC) | विद्यार्थ्यांचे संपूर्ण नाव | प्रवेश घेतलेल्या संस्थेचे नाव | अभ्यास क्रमाचे नाव | काला वधी (वर्ष) | पदवी मधील गुणांची टक्केवारी CGPA / GPA |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३४ | ४ | ५ | ६ | ७ |
| २३ | पुणे | पियुष संजय ननावरे | IIM, Bodhgaya | MBA | २ | ६.९५ |
| २४ | मुंबई | गौरव मोहन कांबळे | VJTI, Matunga, Mumbai | M. Tech. | २ | ६२.७९% |

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.03.26 17:02:23 +05'30'

(प्रशान्त वाघ)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन